शासकीय कर्मचा-यांच्या दि.१० जानेवारी, २००१ रोजी झालेल्या संपामध्ये सहभागी झालेल्या कर्मचा-यांची <u>अनुपस्थिती नियमित करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : एसटीके-१०००/प्र.क्र.११९/२०००/१६-अ,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ८ जून, २००१.**

**<u>प्रस्तावना</u> :-**

राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना, महाराष्ट्र, महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ आणि सरकारी निमसरकारी आणि शिक्षक संघटना समन्वय समिती यांनी त्यांच्या विविध मागण्यांसाठी दि.१०.१.२००१ रोजी शासकीय कर्मचाऱ्यांचा एक दिवसाचा लाक्षणिक संप केला होता. या संपात भाग घेवून जे शासकीय कर्मचारी कामावर अनुपस्थित होते, त्यांची अनुपस्थिती कशी नियमित करावी, अशा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासन असे आदेश देत आहे की, शासकीय कर्मचा-यांच्या दि.१० /१/ २००१ रोजी झालेल्या संपामध्ये सहभागी झालेल्या कर्मचाऱ्यांची या दिवसाची अनुपस्थिती महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ च्या नियम ६३ प्रमाणे असाधारण रजा (विनावेतन, विना भत्ते) देवून नियमित करण्यात यावी. तसेच हा कालावधी वित्त विभाग शासन निर्णय, क्र.सेनिवे-१०८५/२०००/३७/क/८५-सेवा-४, दि.३०.७.८६ अन्वये निवृत्ती वेतनासाठी/ उपदानासाठी सेवा समजण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०५४४/सेवा-८, दि.१५.५.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(द. दां. देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

(कृ.मा.प.

मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ, सचिवालय, मुंबई,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त /सर्व जिल्हाधिकारी/सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई / सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
उप सचिव, वित्त विभाग/कोषा-४, मंत्रालय, मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---